**<u>महाराष्ट्र राज्याचे क्रीडा धोरण-२०१२</u>**

**बृहन्मुंबईमध्ये क्रीडा सुविधा निर्माण करण्यासाठी गठीत केलेल्या उच्चस्तरीय समितीबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : राक्रीधो-२७२१/प्र.क्र.१६५/क्रीयुसे-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २२ नोव्हेंबर, २०२१

<u>वाचा:-</u>

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र.राक्रीधो-२००३/प्र.क्र.११/क्रीयुसे-१, दि. २६.०३.२००३
२) शासन शुध्दीपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.राक्रीधो-२००३/प्र.क्र.११/क्रीयुसे-१, दि. १९.०९.२००५
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.राक्रीधो-२०१२/प्र.क्र.२२२/१२/क्रीयुसे-१, दि. ०४.०६.२०१४
४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. राक्रीधो-३०२०/प्र.क्र.१२५/क्रीयुसे-१, दि. ३१.०८.२०२०
५) शासन पत्र क्र. बैठक-३५२१/प्र.क्र.५३/क्रीयुसे-१, दि.०६.०५.२०२१ (बृहन्मुंबईमध्ये क्रीडा सुविधा निर्माण करण्यासंदर्भात मा. मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या दि. २३.०२.२०२१ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त)

<u>प्रस्तावना:-</u>

महाराष्ट्र स्पोर्टस् इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट प्लॅन अंतर्गत राज्यात क्रीडा सुविधा निर्माण करण्याबाबत संदर्भाधीन क्र. १ येथील दि.२६.०३.२००३ च्या शासन निर्णयान्वये आदेश दिले असून यानुषंगाने तालुका/जिल्हा/विभागीय क्रीडा संकुलांसाठी समिती या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आली आहे. यानुषंगाने मुंबई शहर जिल्हा क्रीडा संकुल समिती संदर्भाधीन क्र. २ येथील दि. १९.०९.२००५ च्या शासन शुध्दीपत्रकान्वये स्थापन करण्यात आली. राज्याचे क्रीडा धोरण-२०१२ मधील मुद्दा क्र. १.५ हा बृहन्मुंबई क्रीडा प्राधिकरणाची स्थापना करणे असा आहे. यानुषंगाने बृहन्मुंबईमध्ये क्रीडा विकास करण्यासाठी मा. मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय संनियंत्रण समिती संदर्भाधीन क्र.३ येथील दि. ०४.०६.२०१४ च्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आली आहे. या समितीची रचना व कार्यकक्षा याबाबत सदर शासन निर्णयान्वये आदेश देण्यात आले आहेत.

महाराष्ट्र स्पोर्टस् इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट प्लॅन अंतर्गत क्रीडा सुविधा निर्माण करण्याच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णय दि. २६.०३.२००३ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या तालुका/जिल्हा/विभागीय क्रीडा संकुल समितीच्या रचनेमध्ये सुधारणा करण्याबाबत निर्णय होऊन यासंबंधीचे आदेश संदर्भाधीन क्र. ४ येथील दि. ३१.०८.२०२० च्या शासन निर्णयान्वये देण्यात आले आहेत.

संदर्भाधीन क्र. २ तसेच क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये मुंबई शहर क्रीडा संकुलांकरीता वेगवेगळ्या समित्या गठीत करण्यात आल्या आहेत. तसेच संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये, बृहन्मुंबईमध्ये क्रीडा विकास करण्यासाठी मा. मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय संनियंत्रण समिती स्थापन करण्यात आली आहे. त्यामुळे मुंबई शहर क्रीडा संकुलाकरीता व बृहन्मुंबईतील अन्य क्रीडा संकुलांकरीता निश्चित कोणती समिती कार्यरत आहे, याबाबत संभ्रम निर्माण होत आहे. हा संभ्रम दूर करण्यासाठी शासन निर्णय दि. ३१.०८.२०२० मधील मुंबई शहर क्रीडा समिती रद्द करण्याचा तसेच शासन निर्णय दि. ०४.०६.२०१४ अन्वये गठीत उच्चस्तरीय संनियंत्रण समितीने घेतलेल्या निर्णयानुसार दैनंदिन कामे करण्यासाठी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अध्यक्षतेखाली उपसमिती नेमण्याचा निर्णय, उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या दि. २३.०२.२०२१ च्या बैठकीत घेण्यात आला. याबाबतचे कार्यवृत्त संदर्भाधीन क्र. ५ येथील पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे. याअनुषंगाने आदेश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

यानुषंगाने शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे:-

१) बृहन्मुंबईमध्ये क्रीडा विकास करण्यासाठी शासन निर्णय दि.०४.०६.२०१४ अन्वये मा. मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय संनियंत्रण समिती स्थापन केली असल्याने या क्रीडा संकुलांसाठी वेगळी जिल्हा/तालुका क्रीडा संकुल समिती आवश्यक नाही. सबब (१) मुंबई शहर क्रीडा संकुल (२) मुंबई उपनगर क्रीडा संकुल आणि (३) ठाणे जिल्हा क्रीडा संकुल या जिल्हा क्रीडा संकुलांसाठी सदर उच्चस्तरीय संनियंत्रण समिती ही जिल्हा क्रीडा संकुल समिती म्हणून आणि बृहन्मुंबईतील अन्य/तालुका क्रीडा संकुलांसाठी तालुका क्रीडा संकुल समिती म्हणून काम पार पाडेल.

२) शासन निर्णय, दि.१९.०९.२००५ तसेच या आदेशातील मुंबई शहर जिल्हा क्रीडा संकुल समिती रद्द करण्यात येत आहे.

३) (अ) मुंबई शहर क्रीडा संकुल (ब) मुंबई उपनगर क्रीडा संकुल आणि (क) ठाणे जिल्हा क्रीडा संकुल ही जिल्हा क्रीडा संकुले, शासन निर्णय, दि. ३१.०८.२०२० मधील अ.क्र. (२) मधील जिल्हा क्रीडा संकुल समितीच्या कार्यकक्षेत येणार नाहीत. तसेच या शासन निर्णयातील अनुक्रमांक (३) मधील मुंबई शहर क्रीडा संकुल समिती रद्द करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे बृहन्मुंबईतील सर्व

तालुका क्रीडा संकुले ही, शासन निर्णय, दि.२६.०३.२००३ मधील तालुका क्रीडा संकुल समितीच्या कार्यकक्षेत येणार नाहीत.

४) बृहन्मुंबईमध्ये क्रीडा विकास करण्यासाठी शासन निर्णय दि.०४.०६.२०१४ अन्वये मा. मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेली उच्चस्तरीय संनियंत्रण समिती, या समितीची रचना तसेच या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.३ मध्ये नमूद समितीची कार्यकक्षा व अन्य आदेश तसेच कायम राहतील.

५) बृहन्मुंबईतील क्रीडा -सुविधांबाबत शासन निर्णय, दि. ०४.०६.२०१४ अन्वये मा. मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय संनियंत्रण समितीकडून घेण्यात येणाऱ्या धोरणात्मक निर्णयाच्या अंमलबजावणीसाठी व बृहन्मुंबईतील क्रीडा संकुलांच्या दैनंदिन/नियमित स्वरूपाच्या कामांसंदर्भात निर्णय घेण्यासाठी आयुक्त (क्रीडा व युवक सेवा) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे उपसमिती गठीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकारी | पद |
|---|---|---|
| १ | आयुक्त, क्रीडा व युवक सेवा | अध्यक्ष |
| २ | आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ३ | आयुक्त, ठाणे महानगरपालिका किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | जिल्हाधिकारी, मुंबई शहर | सदस्य |
| ६ | जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर | सदस्य |
| ७ | जिल्हाधिकारी, ठाणे | सदस्य |
| ८ | मुख्य वास्तुशास्त्रज्ञ किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ९ | कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अंधेरी | सदस्य |
| १० | जिल्हा क्रीडा अधिकारी, मुंबई शहर | सदस्य |
| ११ | जिल्हा क्रीडा अधिकारी, मुंबई उपनगर | सदस्य |
| १२ | जिल्हा क्रीडा अधिकारी, ठाणे | सदस्य |
| १३ | उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग | सदस्य सचिव |

सदर उपसमिती खालील बाबींसंदर्भात कार्यवाही करेल/ निर्णय घेईल:-

१) बृहन्मुंबईतील क्रीडा सुविधांबाबत शासन निर्णय, दि. ०४.०६.२०१४ अन्वये मा. मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय संनियंत्रण समितीकडून घेण्यात येणाऱ्या धोरणात्मक निर्णयांची अंमलबजावणी करणे.

२) सदर उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या कार्यकक्षेत येणाऱ्या सर्व बाबी व मैदाने/स्टेडीयम याबाबत समितीकडून घेण्यात येणाऱ्या निर्णयांची अंमलबजावणी करणे.

३) मुंबई शहर क्रीडा संकुल, मुंबई उपनगर क्रीडा संकुल, ठाणे जिल्हा क्रीडा संकुल तसेच बृहन्मुंबईतील सर्व तालुका क्रीडा संकुलांच्या दैनंदिन/ नियमित स्वरूपाच्या कामांसंदर्भात निर्णय घेणे.

बृहन्मुंबईतील क्रीडा संकुलांबाबत आवश्यकतेनुसार संबंधित विषयातील तज्ज्ञ, सल्लागार, संबंधित प्रकल्पाचे व्यवस्थापक/सल्लागार यांना बैठकीस बोलावण्याचे अधिकार समितीच्या अध्यक्षांना राहतील.

२. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२१११२२१३३०५३०७२१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2021.11.22 13:34:59 +05'30'

**(स्वा. म. नानल)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य.
२. मा. मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई
४. मा. राज्यमंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, म्हाडा, मुंबई
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय मुंबई यांचे स्वीय सहायक
९. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका
१०.आयुक्त, ठाणे महानगरपालिका
११.आयुक्त, एमएमआरडीए, मुंबई
१२.आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका
१३.व्यवस्थापकीय संचालक, सिडको, नवी मुंबई
१४.विभागीय आयुक्त, कोकण विभाग
१५.आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६.जिल्हाधिकारी, मुंबई शहर
१७.जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर
१८. जिल्हाधिकारी, ठाणे

१९.मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई
२०.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
२१.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अंधेरी
२२.संबंधित क्रीडा संकुल समिती
२३.सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा
२४.जिल्हा क्रीडा अधिकारी, मुंबई शहर/ मुंबई उपनगर/ ठाणे
(आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
२५.निवड नस्ती (क्रीयुसे-१).